**मुंबई शहरातील महत्वाच्या व प्रसिध्द, ऐतिहासिक वास्तुंचे /इमारतींचे प्रकाश प्रदीपन (Light Illumination) करणे या कामांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी लागलेले सल्लागार शुल्क व अंदाजपत्रकांचे तांत्रिक पडताळणी शुल्क अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी २०२०/१०/प्र.क्र.६१०/पर्यटन,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : ०२ नोव्हेंबर, २०२१.

<u>संदर्भ</u> :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ६.०४.२०२१.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१

३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीसी २०२०/१०/प्र.क्र.६१०/पर्यटन,दिनांक १३.०९.२०२१

४) पर्यटन संचालनालय यांचे पत्र क्र. प.सं./विकास/Heritage structures/४/प्र.क्र.५६/२०२१/२२८७, दिनांक ०५.१०.२०२१.

५) शासन पत्र क्र. टिडीसी २०२०/१०/प्र.क्र.६१०/पर्यटन, दि.०५.०५.२०२१.

**प्रस्तावना:**

मुंबई शहरातील १३ महत्वाच्या व प्रसिध्द ऐतिहासिक वास्तुंचे /इमारतींचे प्रकाश प्रदीपन (Light Illumination) या रुपये **२८,७१,६७,३५२/-** (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी एकाहत्तर लक्ष सदुसष्ट हजार तीनशे बावन्न फक्त) च्या कामांना संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १३.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कामांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी प्रकल्प किंमतीच्या ३%+ GST म्हणजेच रुपये १,०१,६५,७२४/- इतके सल्लागार शुल्क अदा करण्यास संदर्भ क्रमांक ५ येथील दि.०५.०५.२०२१ च्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर प्रकल्पातील कामांच्या अंदाजपत्रकांची तांत्रिक पडताळणी व तपासणी करण्याच्या अनुषंगाने प्रकल्प किंमतीच्या १.२५ % तांत्रिक पडताळणी शुल्क सार्वजनिक बांधकाम (विद्युत) विभाग, दक्षिण मुंबई यांच्याकडे भरणा करण्यासाठी रुपये ३५,८९,५९१/- इतक्या निधीची मागणी पर्यटन संचालनालयाने संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये केली आहे. यानुसार एकूण रुपये १,३७,५५,३१५/- एवढा निधी संचालक, पर्यटन संचालनालय यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :

मुंबई शहरातील १३ महत्वाच्या व प्रसिध्द ऐतिहासिक वास्तुंचे /इमारतींचे प्रकाश प्रदीपन (Light Illumination) करणे या रुपये **२८,७१,६७,३५२/-** (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी एकाहत्तर लक्ष सदुसष्ट

हजार तीनशे बावन्न फक्त) च्या कामांना संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १३.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कामांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी लागलेले सल्लागार शुल्क प्रकल्प किंमतीच्या ३%+ GST (१८%) म्हणजेच रुपये १,०१,६५,७२४/- आणि सदर प्रकल्पातील कामांच्या अंदाजपत्रकांची तांत्रिक पडताळणी व तपासणी करण्याच्या अनुषंगाने प्रकल्प किंमतीच्या १.२५% म्हणजेच रुपये ३५,८९,५९१/-इतके तांत्रिक पडताळणी शुल्क **असा एकूण रुपये १,३७,५५,३१५/-** एवढा निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन संचालक, पर्यटन संचालनालय यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. <u>अटी व शर्ती</u> :-

१) सदर निधी वितरणाच्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १३.०९.२०२१ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

२) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे तसेच संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन परिपत्रक व शासन निर्णयामधील तरतुदींचे पालन करण्यात यावे.

३) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील व जादा खर्चा प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

४) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च ३१ मार्च, २०२२ पर्यंत करण्यात यावा.

५) वितरीत केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करणे तसेच कामांच्या पुर्णत्वाचे प्रमाणपत्र देणे इत्यादी जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

६) प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ६.०४.२०२१ आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून सदर शासन निर्णय व परिपत्रकामधील प्रत्येक अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

७) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ च्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची पूर्तता करण्यात आली आहे.

३. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखाशीर्ष "मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१, सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. मंजूर करण्यात आलेल्या सहायक

अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेली रक्कम त्यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथे देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करावी व कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सकेतांक २०२१११०२१४२०४६३७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2021.11.02 16:24:59 +05'30'

**(र. ज. कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (का.व्यय-१५/अर्थोपाय / अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.(यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रण अधिका-यांकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
१२. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***